राज्य युवा विकास निधीस अनुदान
निधी वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : निवियो-२०२२/प्र.क्र.६५/क्रीयुसे-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : २९ मार्च, २०२३.

वाचा:-

१) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक युकयो-१६१३/प्र.क्र.६६/क्रीयुसे-३, दि. १९ डिसेंबर, २०१३
२) शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय क्रमांक निवियो-२०२२/प्र.क्र.६५/क्रीयुसे-३, दि. ३१ जानेवारी, २०२३
३) क्रीडा व युवक सेवा, पुणे यांचे पत्र क्रमांक. निधी वितरण/योजना-५६७१/२०२२-२३/का-१०/८४५१, दि. १३ मार्च, २०२३.
४) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४३/अर्थ-३, दि. १६ मार्च, २०२३

**प्रस्तावना :-**

राज्यातील युवांना सक्षम करण्यासाठी विविध युवक कल्याण विषयक उपक्रमांना सहाय्य करण्याकरीता, राज्यात युवा विकासाचे उपक्रम परिणामकारकरित्या राबविण्यासाठी तसेच राज्यातील उदयोन्मुख युवांना उज्वल भविष्याच्या संधी वृध्दिगंत करण्यासाठी त्यांना प्रोत्साहन व आर्थिक सहाय्य देण्याची गरज लक्षात घेऊन राज्य युवा विकास निधीची स्थापना करण्यास संदर्भ क्रमांक (१) च्या शासन निर्णयान्वये मान्यता दिली आहे. सदर उपक्रमाकरीता सन २०२२-२३ करीता सुधारित अंदाजाच्या मर्यादेत रु. १४.०० लक्ष (अक्षरी रूपये चौदा लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील युवांना सक्षम करण्यासाठी विविध युवक कल्याण विषयक उपक्रमांना सहाय्य करण्याकरीता, राज्यात युवा विकासाचे उपक्रम परिणामकारकरित्या राबविण्यासाठी तसेच राज्यातील उदयोन्मुख युवांना उज्वल भविष्याच्या संधी वृध्दिगंत करण्यासाठी त्यांना प्रोत्साहन व आर्थिक सहाय्य देण्यासाठी राज्य युवा विकास निधीतून सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाकरीता रू. १४.०० लक्ष ( अक्षरी रूपये चौदा लक्ष फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास व सदर रक्कम आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरीत उपक्रमाकरीता होणारा खर्च "मागणी क्रमांक : ई-३, २२०४ क्रीडा व युवक सेवा-१०३, (०१)(०९) राज्य युवा विकास निधीला सहायक अनुदान (कार्यक्रम)(२२०४ ५६७१) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) या लेखाशिर्षाखालील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदरचे अनुदान ज्या प्रयोजनासाठी मंजूर करण्यात आले आहेत त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावे.

३. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक, दि. १६ मार्च, २०२३ मधील सूचनांना अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. याकरीता लेखाधिकारी, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. संबंधित लेखाशिर्षातर्गत सन २०२२-२३ या आर्थिक वर्षात मंजूर करण्यात आलेल्या सुधारित अंदाजाच्या मर्यादेत निधी खर्च करण्यात येईल व सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र सादर करण्यात येईल या अटीच्या अधिन राहून सदर निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४. नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १३६/१४७१, दि. २३ मार्च, २०२३ व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक -३८६/व्यय-५, दि. २७ मार्च, २०२३ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०३२९१९३८४१३७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DNYANESHWAR ASARAJI AVHAD

Digitally signed by DNYANESHWAR ASARAJI AVHAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT,
2.5.4.20=190ce31a764c50caee9a11b81ac560fc0d85bb0ebc377f46c4fc0040aae47135, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=05AE42076719D0FCE5DC8ACF3A44FBA50819DD0D088B25A2D0D7CDE0256A48B0, cn=DNYANESHWAR ASARAJI AVHAD
Date: 2023.03.29 19:42:38 +05'30'

**(ज्ञानेश्वर आव्हाड )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, राजभवन, मुंबई यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव,
३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव,
४. मा.मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा/विधानपरिषद) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६. मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
८. आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) -१/२, महाराष्ट्र , मुंबई/नागपूर.
१०. महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१/२,महाराष्ट्र, मुंबई/नागपूर्
११. निवासी लेखा परिक्षा अधिकारी (संचालनालयामार्फत)
१२. विभागीय उपसंचालक, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, (संचालनालयामार्फत)
१३. सर्व जिल्हा क्रीडा अधिकारी, महाराष्ट्र राज्य ( संचालनालयामार्फत )
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी (संचालनालयामार्फत)
१५. कक्ष अधिकारी शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. वित्त विभाग-व्यय-५, अर्थसंकल्प-८ व नियोजन विभाग-का.१४७१, मंत्रालय, मुंबई
१७. कार्यासन अर्थसंकल्प, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. निवड नस्ती, (क्रीयुसे-३).